एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) अंतर्गत केंद्र हिश्श्याची तरतूद वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र.जनेयो.२०१४/प्र.क्र.४२/गृनिधो-२(सेल),**
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक:३१.१०.२०१४.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः व्यय विभाग,वित्त मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र.F.No.५१(७)/PF-I/२०१३-१७७६,दि.३१.३.२०१४
२) शासन निर्णय क्रमांकः गृहनिर्माण व गरीबी निर्मुलन मंत्रालय, भारत सरकार यांचे क्रमांक.एफ.११०२७/२८/२०१४-BSUP/JNNURM/(FTS-१०३३९),दि.३०.४.२०१४
३) मुख्य अभियंता-२ तथा राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, म्हाडा, मुंबई यांचे पत्र क्र.No.MH/CEII/Dy.CE/EEI/JNNURM/IHSDP/A/F.No.१९१-II/४२३/१४,दि.७.४.२०१४
४) मुख्य अभियंता-२ तथा राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, म्हाडा, मुंबई यांचे पत्रक्र.No.MH/CEII/Dy.CE/EEI/JNNURM/IHSDP/A/F.No.१९१III/५५०/१४,दि.१५.०५.२०१४

## शासन निर्णय-

केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाने शहरी भागातील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचावण्यासाठी घोषित झोपडपट्टयांमध्ये राहणाऱ्या तसेच झोपडपट्टयातील आरोग्यास अपायकारक अशा परिस्थितीत राहणाऱ्या झोपडपट्टीवासियांसाठी जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुत्थान कार्यक्रम (JNNURM) हा कार्यक्रम सुरु केलेला आहे. या कार्यक्रमामध्ये एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) या उपकार्यक्रमाचा समावेश करण्यात आला आहे. एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) हा कार्यक्रम शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (बी.एस.यु.पी.) या कार्यक्रमामध्ये समाविष्ट असलेली शहर वगळून राज्यातील उर्वरीत शहरांकरीता सुरु करण्यात आला आहे. झोपडपट्टीचा एकसंघ विकास करणे व पर्यायी निवारा व मुलभूत सोयी सुविधा झोपडपट्टीतील रहिवाशांना उपलब्ध करुन देणे हे या कार्यक्रमाचे मुलभूत उद्दिष्ट आहे.

२. या योजनेची अंमलबजावणी करतांना शासनाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाची राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण (नोडल एजन्सी) म्हणून नेमणूक केली आहे.

३. एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) या योजनेकरीता सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पात केंद्र हिस्सा २२१६१४६१ या लेखाशिर्षांतर्गत, राज्य हिस्सा (सर्वसाधारण) २२१६१४३४ व राज्यहिस्सा (विघयो) २२१६२५७५ या लेखाशिर्षांतर्गत अनुक्रमे रु.२०० कोटी,रु.५० कोटी व रु.२५ कोटींची तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

४. केंद्र शासनाकडून संदर्भ क्र.१ व २ अन्वये खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे प्रकल्पवार एकूण रु.७१९३.५५ लाख राज्यास वितरीत झालेले आहेत.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनाव्दारे वितरीत (२२१६१४६१) | हप्ता क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | भंडारा-१ | १९२७.८० | ५७६.९४ | दुसरा व अंतिम |
| २ | विटा | १३७७.३९ | ३०५.१७ | |
| ३ | सातारा | ३६७८.४० | ११०९.३१ | |
| ४ | अहमदनगर | १३२०.५२ | ४०६.०३ | |
| ५ | इचलकरंजी | ३०४९.६९ | १००९.७१ | |
| ६ | जळगांव | ११९७.२४ | ३६३.७३ | |
| ७ | तेल्हारा | २७५४.४६ | ७२९.४६ | |
| ८ | अचलपूर-१ | २४३४.३४ | ७८७.१७ | |
| ९ | अचलपूर-२ | ३३२४.१० | ९४७.८० | |
| एकूण (१ ते ९) | | | ६२३५.३२ | |
| १० | मुर्तीजापूर-१ | २४५६.४० | ७९१.३४ | दुसरा व अंतिम |
| ११ | तुमसर | ६२९.५९ | १६६.९१ | |
| एकूण (१० ते ११) | | | ९५८.२३ | |
| एकूण (१ ते ११) | | | ७१९३.५५ | |

५. केंद्र हिश्श्यापोटी राज्यास प्राप्त परंतू, अवितरीत असलेला रु.७१,९३,५५,००० चा निधी तसेच सुकाणू अभिकरणाने संदर्भाधीन (३) व (४) येथील पत्रान्वये कळविल्याप्रमाणे परीगणीत रु.८३२,३१,८०० एवढा राज्य हिस्सा व अनुसुचित जाती उपयोजनंतर्गत (विशेष घटक योजनेंतर्गत)रुपये८६३,३६,१०० एवढा राज्य हिस्सा असा एकूण रु.८८,८९,२२,९००(रु.अठ्ठयाऐंशी कोटी एकोणनव्वद लाख बावीस हजार नऊशे फक्त) इतका निधी या शासन निर्णयाव्दारे सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या प्रकल्पांसाठी नागरी स्वराज्य संस्थांस त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार वितरीत करण्यासाठी राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणास या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

६. राज्य शासनामार्फत उपर्लध करुन देण्यात येणारी सदर रक्कम तात्काळ महाराष्ट्र निवारा निधीत जमा करण्यात यावी व नागरी स्वराज्य संस्थांना वितरीत होईपर्यंत सदर रक्कम महाराष्ट्र निवारा निधीतच ठेवण्यात यावी.

७. प्राधिकरणाने सदरची रक्कम खर्च करण्यासाठी अवर सचिव, गृहनिर्माण विभाग (आहरण व संवितरण अधिकारी) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले विहित प्रपत्रातील सदर रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास याच महिन्यात सादर करण्याची दक्षता घ्यावी.

८. ज्या प्रयोजनासाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध करुन दिला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे व सदर तरतूद केंद्र शासनाच्या निकषानुसार खर्च होईल याची दक्षता घ्यावी. सदर रकमेचे वितरण MP-SIMS या शासनाच्या संगणक प्रणालीवर भरण्याची जबाबदारीही प्राधिकरणाची राहील. अनुसुचित जाती उपयोजनेंतर्गत मंजूर रक्कम त्या प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीच्या घरकुलांकरीता वापरली जाईल याची दक्षता संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी.

९. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणावर योजनेअंतर्गत होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत केंद्र व राज्य शासनास सादर करणे बंधनकारक राहील. जर वितरीत केलेली रक्कम ज्या प्रयोजनासाठी वितरीत केली आहे, त्या प्रयोजनासाठी वापरली नाही, तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यात येईल.

१०. या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन/महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरीता/तपासणीकरीता सादर करण्याची प्राधिकरणावर जबाबदारी असेल. सदर लेखाशिर्षकाचे दर महिन्याअखेरचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयातील लेख्याशी ठेउन त्याबाबतचा अहवाल दर महिना अखेर शासनास सादर करण्यात यावा.

११. या शासननिर्णयाव्दारे वितरीत करण्यात असलेली रक्कम खालील प्रमाणे लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी व त्या त्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ करीता मंजूर तरतुदीतून हा खर्च भागविण्यात यावा.
**अ)** केंद्र हिश्श्यापोटी वितरीत रु.७१,९३,५५,०००/-(रु.एकात्तर कोटी त्र्याण्णव पंचावन्न हजार) हा निधी मागणी क्रमांक क्यू -३ मुख्य लेखाशिर्ष २२१६ -गृहनिर्माण- ८०,सर्वसाधारण,१०३,गृहनिर्माण मंडळे महामंडळे इत्यादींना सहाय्य,(०५) सहायक योजना (जेएनएनयुआरएम) (केंद्र हिस्सा), (०५) (०२) जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी नवीकरण अभियान-एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (सर्वसाधारण योजना) (केंद्र हिस्सा) (८० टक्के) ३१, सहायक अनुदान (२२१६ १४६१) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीतून,

**ब)** राज्य हिस्सा सर्वसाधारण घटकापोटी वितरीत करावयाचा रु.८,३२,३१,८००/-(रुपये आठ कोटी बत्तीस लाख एकतीस हजार आठशे फक्त) इतका निधी मागणी क्रमांक क्यू-३ मुख्य लेखाशिर्ष २२१६-गृहनिर्माण-८०, सर्वसाधारण, १०३,गृहनिर्माण मंडळे महामंडळे इत्यादींना सहाय्य, (०४) सहायक योजना (जेएनएनयुआरएम) (राज्य हिस्सा), (०४) (०२) जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी नवीकरण अभियान-एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (सर्वसाधारण योजना) (राज्य हिस्सा) ३१, सहायक अनुदान (२२१६ १४३४) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीतून

**क)** अनुसुचित जाती उपयोजनेंतर्गत (विशेष घटक योजनेंतर्गत) रुपये ८,६३,३८,१००एवढा राज्य हिस्सा (रु.आठ कोटी त्रेसष्ट लाख अडतीस हजार शंभर फक्त) इतका निधी मागणी क्रमांक क्यू-३ मुख्य लेखाशीर्ष २२१६-गृहनिर्माण-८०, सर्वसाधारण,१०३,गृहनिर्माण मंडळे महामंडळे इत्यादींना सहाय्य, सहायक योजना (जेएनएनयुआरएम) (राज्य हिस्सा), (०४) (०४) जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी नवीकरण अभियान-एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (विशेष घटक योजना) (राज्य हिस्सा) ३१, सहायक अनुदान (२२१६ २५७५) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीतून वितरीत करण्यात यावे.

१२. हे शासन निर्णय नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ५५२/व्यय -३,दि.०८/१०/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४१०३१११११३५०३२०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pathade Kishor Govind

Digitally signed by Pathade Kishor Govind
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pathade Kishor Govind
Date: 2014.10.31 11:28:25 +05'30'

**कि.गो.पठाडे**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
३) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२.

४) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन,मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन,मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
७) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.
८) मुख्य अभियंता -१,राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम कक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.
९) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा,मुंबई.
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा,नागपूर.
११) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग,नवी मुंबई.
१२) उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोंकण विभाग,नवी मुंबई.
१३) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ,गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई.
१६) मुख्य अधिकारी,पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
१७) प्रधान सचिव,वित्त विभाग तसेच वित्त विभागंतर्गत (व्यय-३,अर्थसंकल्प१७ व अर्थोपाय कार्यासन),मंत्रालय,मुंबई-३२.
१८) प्रधान सचिव,नियोजन विभाग (का.१४६१),मंत्रालय,मुंबई-३२.
१९) प्रधान सचिव,सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
२०) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
२१) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
२२) सचिव,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
२३) उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग (संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)
२४) सह संचालक,लेखा व कोषागरे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मंत्रालयासमोर, मुंबई.
२५) संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी, (शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रानुसार)
२६) निवडनस्ती/गृनिधो-२(सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

शासन निर्णय क्र.जनेयो.२०१४/प्र.क्र.४२/गृनिधो-२(सेल)

विवरणपत्र

(रुपये लाखात)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनाव्दारे वितरीत (२२१६१४६१) | राज्य शासनाचा हिस्सा सर्वसाधारण (२२१६१४३४) | राज्य शासनाचा हिस्सा विशेष घटक (२२१६२५७५) | हप्ता क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | भंडारा-१ | १९२७.८० | ५७६.९४ | १३७.६४६ | ५८.४२ | दुसरा व अंतिम |
| २ | विटा | १३७७.३९ | ३०५.१७ | ३९.०७ | १६.६७ | |
| ३ | सातारा | ३६७८.४० | ११०९.३१ | १०५.०१५ | ९४.०७ | |
| ४ | अहमदनगर | १३२०.५२ | ४०६.०३ | ३८.२१५ | ३८.२१५ | |
| ५ | इचलकरंजी | ३०४९.६९ | १००९.७१ | ५७.६७ | ११९.४६ | |
| ६ | जळगांव | ११९७.२४ | ३६३.७३ | ३८.६७ | २७.९५ | |
| ७ | तेल्हारा | २७५४.४६ | ७२९.४६ | ९१.३३५ | ४२.९० | |
| ८ | अचलपूर-१ | २४३४.३४ | ७८७.१७ | १२८.००७ | २४.३८ | |
| ९ | अचलपूर-२ | ३३२४.१० | ९४७.८० | १७७.९६ | - | |
| एकूण (१ ते ९) | | | ६२३५.३२ | ८१३.५८८ | ४२२.०६५ | |
| १० | मुर्तीजापूर-१ | २४५६.४० | ७९१.३४ | १८.४७ | ३८२.६५६ | दुसरा व अंतिम |
| ११ | तुमसर | ६२९.५९ | १६६.९१ | ०.२६ | ५८.६८ | |
| एकूण (१० ते ११) | | | ९५८.२३ | १८.७३० | ४४१.२९६ | |
| एकूण (१ ते ११) | | | ७१९३.५५ | ८३२.३१८ | ८६३.३६१ | |